अपंग व्यक्ती अधिनियम(समानसंधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ नुसार जलसंपदा विभागाच्या सेवेतील गट क व ड मधील पदांवर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी केंद्रशासनाने अपंगांच्या पदनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादी नुसार सुयोग्य पदे निश्चित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र : अपंग १२१०/प्र.क्र.३३६/२०१०/आ(तांत्रिक),
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १३/०१/२०११.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रः एसआरव्ही १०८७/३५७६/१४३३/१६-अ, दि. २३/५/१९७८.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रः एसआरव्ही १०८१/सीआर१५/१६-अ, दि. ०३/९/१९८२.
३. अपंग व्यक्ती अधिनियम(समानसंधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा -१)
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रः एसआरव्ही १०९८/प्र.क्र.१२/१६-अ, दि. ०२/०५/१९९८.
५. शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रः नियुक्ती ११९९/(३१७/९९)/भाग-१/आ(तां), दि. ३०/०९/२००३.
६. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रः संकीर्ण ११०४/१९७३/(२१५/२००४)/आ(तां), दि. ०६/०१/२००५.
७. शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रः नियुक्ती ११०५/८४२/(१०५/०५)/आ(तां), दि. १५/१०/२००५.
८. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रः न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३, दि. ०३/०८/२०१०.

**प्रस्तावना :**

अपंग व्यक्ती अधिनियम (समानसंधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ या कायदयान्वये अपंगांच्या सर्वांगिण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासन सेवेत ३ टक्के पदे आरक्षित करण्याची तरतूद आहे. या अधिनियमाच्या अनुषंगाने संदर्भ क्र. ४ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दि २/५/१९९८च्या शासन निर्णयान्वये शासन सेवेत अंध किंवा अल्पदृष्टी, बहीरेपणा व अस्थिव्यंग या व्याधीने ग्रस्त असलेल्या व्यक्तींसाठी सरळसेवा भरतीने आरक्षण ठेवण्याच्या सूचना प्रशासकीय विभागांना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार अपंग व्यक्तींसाठी पदे सुनिश्चित करण्याची कार्यवाही सर्व प्रशासकीय विभागांकडून करण्यात येते. जलसंपदा विभागातील गट- ब- अराजपत्रित,

गट क व ड मधील पदांवर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी आरक्षण ठेवण्याकरीता संदर्भ क्र. ७ येथील दि.१५/१०/२००५ च्या शासन निर्णयानुसार पदे सुनिश्चित करण्यात आली आहेत.

२. शासनाच्या विविध विभागांमार्फत अपंगांसाठी करण्यात आलेल्या पद निश्चितीमध्ये एकवाक्यता नाही किंवा ती परिपुर्ण नाही, यासाठी अपंग व्यक्तींसाठी सुधारीत पदनिश्चिती करणे व त्या अनुषंगाने अपंगांची राखीव पदे भरणे यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्र.२२५/२००९ दाखल करण्यात आली आहे. या याचिकेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने राज्य शासनाच्या शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच केंद्र शासनाने या पदांना ठरवून दिलेले आरक्षण विचारात घेवून अपंगांसाठी नव्याने सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरून तज्ञ समितीने केलेल्या शिफारशीनुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या संदर्भ क्र. ८ येथील दि. ३/०८/२०१० च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत व त्यानुसार कार्यवाही करण्याचे निर्देश दिले आहेत. वरील बाबी विचारात घेवून जलसंपदा विभागातील गट क व गट ड मधील विविध संवर्गातील पदे अपंगांसाठी नव्याने सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने पुढिलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या जनहित याचिका क्र.२२५/२००९ संदर्भात शासकीय व निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगांसाठी सुनिश्चित करण्याबाबतचे निर्देश दिले असल्याने उपरोक्त संदर्भ क्र. ५,६ व ७ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत आहेत.

२. अपंग व्यक्ती अधिनियम (समानसंधी, संपुर्ण सहभाग व हक्काचे संरक्षण) अधिनियम १९९५ (१९९६ चा-१) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार जलसंपदा विभागांतर्गत गट क व ड मधील विविध प्रवर्गातील सोबतच्या परिशिष्ठात दर्शविल्याप्रमाणे सुनिश्चित पदांवर अपंगत्वाचे प्रमाण किमान ४० टक्के असलेल्या अपंग व्यक्तींना ३ टक्के इतके आरक्षण सरळसेवा भरतीमध्ये ठेवण्यात यावे.

३. संबंधितांकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यावर अश्या उमेदवारांस शारीरिक पात्रतेसंदर्भात विहीत केलेल्या वैद्यकीय मंडळाने प्रस्तावित केल्यानंतरच अश्या अपंग व्यक्तींची जलसंपदा विभागांतर्गत गट क व ड मधील पदांवर नियुक्ती करण्यात यावी. याशिवाय खालील निकषांनुसार अशा अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

अ. संबंधित सेवाप्रवेश नियमांच्या तरतूदीनुसार अर्हता असेल तर,

ब. त्या त्या संवर्गातील पदांची कर्तव्ये व जबाबदा-या लक्षात घेवून त्याप्रमाणे वैद्यकीय मंडळाने सक्षम ठरविल्यास,

क. जलसंपदा विभागांतर्गत गट क व ड मधील विविध संवर्गात सोबतच्या परिशिष्ठामध्ये दर्शविल्यानुसार अपंगत्वाच्या प्रत्येक प्रकारास प्रत्येकी एक याप्रमाणे एकूण ३ टक्के पर्यंत सरळसेवा भरतीने आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.

४. जलसंपदा विभागामार्फत भरण्यात येणारी गट क व ड गटांसाठी सरळसेवेने भरावयाच्या पदांसाठी अपंग उमेदवारांसाठी शारीरिक पात्रतेचे निकष कोणते असावेत याचा तपशील सोबतच्या परिशिष्ठात दिलेला आहे. त्या निकषांवर अशा अपंग व्यक्तीची सरळसेवा नियुक्तीने भरती करण्यात यावी.

५. हे आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. ८ येथील आदेशान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०११३२०४८४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ. अ. कोदे)
शासनाचे उप सचिव

प्रत :

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
४. स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा)(म.कृ.खो.वि.मं.), मंत्रालय, मुंबई.
५. स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा)(म.कृ.खो.वि.मं. वगळून), मंत्रालय, मुंबई.
६. स्वीय सहायक, सर्व मंत्री, महाराष्ट्र शासन
७. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा)(म.कृ.खो.वि.मं.), मंत्रालय, मुंबई.
८. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
९. स्वीय सहायक, सर्व राज्यमंत्री,महाराष्ट्र शासन.
१०. सचिव (जसंप्र व वि.) /सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व कार्यकारी संचालक,( जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील महामंडळे)
१२. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१५. सर्व विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी.
१६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
१७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. सेवायोजन संचलयनालय, मुंबई.
२१. सर्व अधीक्षक अभियंता व उप सचिव, जलसंपदा विभाग.
२२. सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग.
२३. सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, जलसंपदा विभाग.
२४. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२५. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. जलसंपदा विभागातील सर्व आस्थापना कार्यासने, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
२९. आ (तांत्रिक) संग्रहार्थ.

********

## परिशिष्ठ

जलसंपदा विभागांतर्गत गट क व ड मध्ये सरळसेवा भरतीने
नियुक्ती करण्यासाठी केंद्र शासनाच्या निकषांच्या धर्तीवर अपंग व्यक्तींसाठी शारीरिक
पात्रतेचे सुधारीत निकष (केंद्र शासनाने अपंगांच्या पदेनिश्चितीबाबत प्रसिध्द केलेल्या यादीनुसार)
शासन निर्णय क्र : अपंग १२१०/(प्र.क्र.३६६/१०)/आ(तांत्रिक), दि. १३/ १/२०११ चे सहपत्र.

| अ.क्र. | पदनाम | **निश्चित केलेली पात्रता** | | |
|---|---|---|---|---|
| | | अंध/ अल्पदृष्टी | कर्णबधीर | अस्थिव्यंग |
| | **गट क** | | | |
| १ | वरिष्ठ लिपीक | बी /एल व्ही | एच एच | बी.एल/ओ एल /ओ ए/ /ओ ए एल |
| २ | आरेखक/ अनुरेखक | एल व्ही | | ओ एल/ बी.एल |
| ३ | कनिष्ठ लिपीक | बी /एल व्ही | एच एच | बी.एल/ओ एल /ओ ए/ /ओ ए एल |
| ४ | भांडारपाल | | एच एच | ओ एल/ओ ए |
| ५ | सहायक भांडारपाल | | एच एच | ओ एल/ओ ए |
| ६ | दुरध्वनी चालक | बी /एल व्ही | | बी.एल/ओ एल/ ओ ए |
| ७ | छायाचित्रकार | | एच एच | ओ एल |
| ८ | ग्रंथपाल | | एच एच | ओ एल/ओ ए/ |
| ९ | सहायक ग्रंथपाल | | एच एच | ओ एल/ओ ए/ |
| १० | प्रयोगशाळा सहायक | | एच एच | ओ ए /बी.एल/ओ एल |
| ११ | लघुटंकलेखक | बी /एल व्ही | | बी.एल/ओ एल/ ओ ए/ ओ ए एल |
| | **गट ड** | | | |
| १ | दफ्तरी | बी /एल व्ही | एच एच | ओ एल/ओ ए |
| २ | शिपाई | बी /एल व्ही | एच एच | ओ एल |

**पी डी** – पार्शली डेफ , **बी.एल** - बोथ लेग अफेक्टेड, **पी एस** - पार्शली सायटेड, **एल व्ही** – लो व्हीजन, **ओ एल** - वन लेग अफेक्टेड, **एच एच** – हिअरींग हॅन्डीकॅप, **ओ ए** - वन आर्म अफेक्टेड, **बी**- ब्लाईंड, **ओ ए एल**- वन आर्म ॲन्ड वन लेग अफेक्टेड